महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास वेतन बाबीकरिता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात माहे एप्रिल, २०२३ ते जून, २०२३ चे वेतन, अतिरिक्त कार्यभार, महागाई भत्ता, व वेतनावरील बाबींकरीता अनुदान वितरीत करणेबाबत..

महाराष्ट्र शासन
अल्पसंख्याक विकास विभाग
**शासन निर्णय क्रमांक :-राअआ-२०२३/प्र.क्र.५७/का-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: ०४ मे, २०२३.

वाचा :-

(१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं- २०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२ एप्रिल, २०२३.

(२) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र.राअआ २०२३/ प्र.क्र.५७/ का.९, दिनांक २१ एप्रिल, २०२३.

(२) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाचे पत्र क्र.राअआ/लेखा/प्र.क्र.०१/का-०४/ २०२३-२४, दिनांक २४/०४/२०२३ चे पत्र व सहपत्र.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयातील अधिकारी / कर्मचारी यांच्या वेतन या बाबीकरीता माहे एप्रिल, २०२३ ते जून, २०२३ चे वेतन व वेतनावरील बाबीकरीता अनुदान उपलब्ध करून देण्याबाबत उपरोक्त संदर्भ क्र.३ येथील पत्र व सहपत्रान्वये शासनास विनंती केली आहे. त्यानुसार सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीत केलेल्या निधीपैकी बीम्स प्रणालीवर उपलब्ध असेलल्या निधी मधून महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयातील अधिकारी / कर्मचारी यांच्या वेतन या बाबीकरीता माहे एप्रिल, २०२३ ते जून, २०२३ चे वेतन व वेतनावरील बाबींकरीता अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयासाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये "२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३६ सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशिर्षांतर्गत एकूण रू.९२,०९,०००/-(अक्षरी रुपये ब्याण्णव लक्ष नऊ हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

२. उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील वित्त विभाग, शासन परिपत्रक दिनांक १२ एप्रिल, २०२२ मधील मार्गदर्शक सूचनांनुसार वेतन या बाबीकरीता एकूण अर्थसंकल्पीत निधीच्या २०% च्या मर्यादेत म्हणजेच एकूण रू.१८,४१,८००/- (अक्षरी रूपये अठरा लक्ष एकेचाळीस हजार आठशे फक्त) इतका निधी वितरणासाठी उपलब्ध करून दिलेला आहे. त्यापैकी रू.९,२०,९००/- इतके अनुदान दि.२१.४.२०२३ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आले आहे. आयोगाच्या संदर्भ क्र.३ च्या पत्रात नमूद केल्यानुसार सदर वितरीत केलेल्या निधीपैकी रू.५,०२,७५५/- (अक्षरी रू.पाच लक्ष दोन हजार सातशे पंचावन्न फक्त) इतका निधी खर्ची पडला असून उर्वरीत रू.४,१८,१४५/- (अक्षरी रू.चार लक्ष अठरा हजार एकशे पंचेचाळीस फक्त ) इतका निधी माहे एप्रिल, २०२३ च्या वेतनावरील खर्चाकरीता वापरण्यात येईल या बाबत आयोगाने उपयोगिता प्रमाणपत्राची प्रत शासनास सादर केली आहे. सद्यस्थितीत वेतन या बाबीकरीता रू.९,२०,९००/- (अक्षरी रूपये नऊ लक्ष विस हजार नऊशे फक्त ) इतका निधी बिम्स प्रणालीवर उपलब्ध आहे. यास्तव, वित्त विभागाने उपलब्ध करून दिलेला रू.९,२०,९००/- (अक्षरी रूपये नऊ लक्ष विस हजार नऊशे फक्त ) इतका निधी महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास माहे एप्रिल, २०२३ ते जून, २०२३ चे वेतन व वेतनावरील बाबींकरीता मागणी क्रमांक झेड ई ०१, २२३५ ए २४९ अनिवार्य (३६) सहायक अनुदान (वेतन) करीता सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी अनुदान उपलब्ध करून देण्यात येत आहे.

३. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयासाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात माहे एप्रिल, २०२३ ते माहे जून, २०२३ चे वेतन व वेतनावरील बाबींकरीता एकूण रू.९,२०,९००/- (अक्षरी रूपये नऊ लक्ष विस हजार नऊशे फक्त ) इतके अनुदान ३६ सहायक अनुदाने (वेतन) या उद्दिष्टाखाली खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्या आयोग, मुंबई यांच्याकडे वित्त विभागाच्या अटी व शर्तीनुसार तपशीलवार माहिती सादर करण्याच्या अटीस अधीन राहून सूपूर्द करण्यात येत आहे.

| अ. क्र. | तपशीलवार लेखाशीर्ष | सन २०२३-२४ साठी अर्थसंकल्पीत अनुदान (रुपये) | माहे मार्च, २०२३ चे वेतन, महागाई भत्ता फरक मार्च २०२३ व वेतनावरील बाबींकरीता १०%नुसार वितरीत निधी (एकूण रूपये) | बिम्स प्रणालीनुसार उपलब्ध अनुदान (एकूण रूपये) | माहे एप्रिल,२०२३ ते जून, २०२३ चे वेतन, व वेतनावरील बाबींकरीता वितरीत करावयाचा निधी ( एकूण रुपये) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | ३६, सहायक अनुदाने (वेतन) | रु.९२,०९,०००/- | रु.९,२०,९००/- | रु.९,२०,९००/- | रु.९,२०,९००/- |
| | **एकूण** | **रु.९२,०९,०००/-** | रु.९,२०,९००/- | रु.९,२०,९००/- | **रु.९,२०,९००/-** |
| | | | | **एकूण** | **(अक्षरी रूपये नऊ लक्ष वीस हजार नऊशे फक्त)** |

४. सदर तरतूद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता, अवर सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी तर सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने सन २०२३-२४ च्या मासिक निधी विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे आयोगाच्या कार्यालयाचा खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घेण्यात यावी. वेतन या लेखाशिर्षांतर्गत वितरीत करण्यात आलेला निधी त्याच उद्दिष्टासाठी खर्च करण्यात यावा. या आदेशान्वये वितरीत करण्यात आलेल्या निधीतून केलेल्या खर्चाचा तपशील, उपयोगिता प्रमाणपत्र Utilization Certificate शासनांस सादर करावे. तसेच संदर्भ क्र. (१) मधील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये विहीत अटी व तरतुदींचे काटेकोरपणे पालन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांनी करावे.

५. उपरोक्त निधी "मागणी क्र. झेडई -१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३६, सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

६. "सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग -२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२/०४/२०२३ मधील अटींची तसेच सोबतच्या परिशिष्टामधील सर्व बाबींची पूर्तता करण्याच्या अटीस अनुसरुन सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे."

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५०४१२५९२३७६१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SARANGKUMAR VASANTRAO PATIL

Digitally signed by SARANGKUMAR VASANTRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=ff4eb5e12b895076f38d0375877408323ed82b780f45ba77108c21a289d50d4b, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=47644BA707F1CC419E5362269A74B7B1EC6AB4F745648DEF2597546D88711BB4, cn=SARANGKUMAR VASANTRAO PATIL
Date: 2023.05.04 13:05:28 +05'30'

**( सारंगकुमार पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई
२. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
५. अवर सचिव, ( व्यय-४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
६. कक्ष अधिकारी, (का-७) , अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
७. निवडनस्ती (कार्यासन-९).